**सहवीज निर्मिती प्रकल्प राबविण्यासाठी सहकारी साखर कारखान्यांना शासकीय भागभांडवल मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ससाका-२०१९/प्र.क्र.१२/३-स**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २७ मार्च, २०२५.

<u>वाचा</u>:-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-४४०६/प्र.क्र.७३/३-स, दि.२०.०२.२००८.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-४४०६/प्र.क्र.७३/३स, दि.०६.०३.२००८.
३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. अपाऊ-२००७/प्र.क्र.६९३/ऊर्जा-७, दि.१४.१०.२००८.
४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. अपाऊ-२००९/प्र.क्र.१५२८/ऊर्जा-७, दि.०३.०८.२००९.
५) शासन पुरकपत्र उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. अपाऊ-२०१०/प्र.क्र.३६०/ऊर्जा-७,दि.०३.०३.२०११.
६) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. अपाऊ-२०१२/प्र.क्र.४९/ऊर्जा-७, दि.१३.०२.२०१३.
७) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. बगास-२०१३/प्र.क्र.१६५/ऊर्जा-७, दि.३१.०१.२०१४.
८) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१५/प्र.क्र.३२/३-स, दि.३०.०३.२०१६.
९) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१५/प्र.क्र.३३/३-स, दि.२७.०३.२०१८.
१०) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१९/प्र.क्र.१२/३-स, दि.२३.१२.२०२०.
११) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१९/प्र.क्र.१२/३-स, दि.३१.०३.२०२१.
१२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१९/प्र.क्र.१२/३-स, दि.३०.०३.२०२२.
१३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१९/प्र.क्र.१२/३-स, दि.३१.०५.२०२३.
१४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र-ससाका .२०१९/प्र.क्र.१२/३स-, दि.०३.०१.२०२४.
१५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१९/प्र.क्र.१२/३-स,दि.३०.०३.२०२४.
१६) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र ३-अर्थ/८०.क्र.प्र/२०२४-अर्थसं .दि.२५.०७.२०२४.

**<u>प्रस्तावना:</u>**

राज्यातील सहकारी साखर कारखान्यांमार्फत सहवीज निर्मिती प्रकल्प राबविण्याबाबतचे धोरण संदर्भ क्र.१ येथील दिनांक २०.०२.२००८ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे. या धोरणानुसार राज्यात सहकारी साखर कारखान्यांच्या माध्यमातून येत्या तीन वर्षात सहवीज निर्मिती प्रकल्पांमधून १००० मे. वॅट वीजनिर्मिती करण्याचे उद्दिष्ट ठरविण्यात आले आहे. तसेच या धोरणानुसार सहवीज निर्मिती प्रकल्प राबविणाऱ्या सहकारी साखर कारखान्यांना प्रकल्प खर्चाच्या ५% शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येणार आहे. त्यानुषंगाने संदर्भीय शासन निर्णय क्र.२ अन्वये गठीत करण्यात आलेल्या प्रकल्प उभारणी व समन्वय समितीने सहवीज प्रकल्पाला आर्थिक व प्रशासकीय मान्यता दिलेल्या पात्र सहकारी साखर कारखान्यांना देय असलेले ५% शासकीय भागभांडवल मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:</u>**

राज्यातील सहकारी साखर कारखान्यांमार्फत सहवीज निर्मिती प्रकल्प राबविण्याचे धोरण दिनांक २०.०२.२००८ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे. सदर धोरणाची अंमलबजावणी परिणामकारकरित्या व्हावी म्हणून दि.०६.०३.२००८ च्या शासन निर्णयान्वये साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य,

पुणे यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प उभारणी व समन्वय समिती गठित करण्यात आली आहे. सदर समितीने सहवीज निर्मिती प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय, तांत्रिक व आर्थिक मान्यता दिलेल्या (१) लोकनेते मारुतराव घुले पाटील ज्ञानेश्वर सहकारी साखर कारखाना लि. भेंडे, ता. नेवासा, जि. अहिल्यानगर, (२) शरद सहकारी साखर कारखाना लि. नरंदे, जि. कोल्हापूर,(३) कुकडी सहकारी साखर कारखाना, लि. पिंपळगाव पिसा, ता. श्रीगोंदा, जि. अहिल्यानगर, (४) स. म. शिवाजीराव नागवडे, श्रीगोंदा सहकारी साखर कारखाना लि. अहिल्यानगर व (५)राजारामबापू पाटील सहकारी साखर कारखाना, राजारामनगर, साखराळे, जि. सांगली या ५ सहकारी साखर कारखान्यांना सन २०२३-२४ मध्ये रूपये ३२०.०० लाख इतके शासकीय भागभांडवल सहवीज निर्मितीसाठी वितरित करण्यात आले. आता, उपरोक्त नमूद ५ पात्र सहकारी कारखान्यांना रु.८४८.५३ लाख (रुपये आठ कोटी अठ्ठेचाळीस लाख त्रेपन्न हजार फक्त) इतके शासकीय भागभांडवल प्रचलित नियम व विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करण्याच्या अधिन व उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अधीन राहून सहवीज निर्मितीसाठी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार शासकीय धोरणानुसार ५% प्रमाणे सहकारी साखर कारखान्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आल्याप्रमाणे (रकाना क्र.९) शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येत आहे.

**(रूपये लाखात)**

| अ. क्र | कारखान्याचे नांव | प्रकल्प क्षमता | प्रकल्प किंमत | ५% प्रमाणे वितरीत करावयाचा निधी | यापूर्वी वितरीत केलेली रक्कम | उर्वरित देय रक्कम | अर्थसंकल्पीय तरतुद | मंजूर शासकीय भागभांडवल सप्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | |
| १ | लोकनेते मारुतराव घुले पाटील ज्ञानेश्वर सहकारी साखर कारखाना लि., ता. नेवासा, जि. अहिल्यानगर. | १९.५ मे. वॅट | ७५७६.७२ | ३७८.८४ | १५३.४८ | २२५.३६ | ८४८.५३ | १४६.४७ |
| २ | शरद सहकारी साखर कारखाना लि. नरंदे, जि. कोल्हापूर. | १३ मे. वॅट | २७७१.३३ | १३८.५७ | ६२.३२ | ७६.२५ | | ४९.५६ |
| ३ | कुकडी सहकारी साखर कारखाना, लि. पिंपळगाव पिसा, ता. श्रीगोंदा, जि. अहिल्यानगर. | १५ मे. वॅट | ७१७५.८१ | ३५८.७९ | १६०.०२ | १९८.७७ | | १२९.२० |
| ४ | सहकार महर्षी शिवाजीराव | २६ मे. वॅट | १३०४३.५० | ६५२.१८ | २६४.२३ | ३८७.९५ | | २५२.१५ |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | नागवडे , श्रीगोंदा सहकारी साखर कारखाना लि. अहिल्यानगर. | | | | | | | |
| ५ | राजारामबापू पाटील ससाका, राजारामनगर, साखराळे, जि. सांगली | २८ मे. वॅट | १४०२४.९८ | ७०१.२५ | २८४.०८ | ४१७.१७ | | २७१.१५ |
| **एकूण** | | | ४४५९२.३४ | २२२९.६३ | **९२४.१३** | १३०५.५० | | ८४८.५३ |

**३.** सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात **"मागणी क्रमांक व्ही- ३, मुख्य लेखाशिर्ष ४४२५, सहकारावरील भांडवली खर्च, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (००) (०४) सहकारी साखर कारखान्यांना सहवीज निर्मितीसाठी भाग भांडवली अंशदान (४४२५ २१७२) ५४ गुंतवणुका"** या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या रूपये ८४८.५३ लाख इतक्या तरतुदीमधून सदर खर्च खर्ची टाकण्यात यावा.

**४.** उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने सहवीज निर्मिती प्रकल्पाबाबत दि.३१.०१.२०१४ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती जशाच्या तशा लागू राहतील. तसेच सदर साखर कारखान्यांना यापूर्वी शासकीय भागभांडवल मंजूर करताना ज्या अटी व शर्ती लागू करण्यात आल्या होत्या त्या अटी व शर्ती सध्यादेखील लागू राहतील **(शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१५/ प्र.क्र.३३/३-स, दि.२७.०३.२०१८ मधील परिशिष्ट "अ")**. सदर कारखान्यांकडून अटी व शर्तींची पूर्तता करुन घेण्याची जबाबदारी साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

**५.** प्रस्तुत प्रकरणी लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना या आदेशाद्वारे आहरण व संवितरण अधिकारी तसेच, संचालक (प्रशासन), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यास अनुसरुन आहरण व संवितरण अधिकारी यांनी उपरोक्त नमूद **रु.८४८.५३ लाख** इतकी रक्कम आहरण करुन उपरोक्त सहकारी साखर कारखान्यांना रकाना क्र.९ मध्ये दर्शविल्याप्रमाणे शासकीय भागभांडवल अदा करावी.

**६.** सदर रक्कमेचा विनियोग कारखाना आवश्यक त्या बाबीकरीताच करीत आहे याबाबतचे संनियंत्रण साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी ठेवावे व याबाबतचा अहवाल शासनास वेळोवेळी सादर करावा. शासकीय भागभांडवलाची रक्कम कारखान्यांना वितरित करण्यापूर्वी **शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१५/प्र.क्र.३३/३-स, दि.२७.०३.२०१८ मधील परिशिष्ट "अ"** मध्ये नमूद अटी व शर्ती कारखान्यास बंधनकारक असल्याचे आहरण व संवितरण अधिकाऱ्याने कारखान्याकडून लिहून घ्यावे. सदर भागभांडवलाच्या परतफेडीसाठी संबंधित सहकारी साखर कारखान्याकडून भागभांडवल विमोचन निधी अटी व शर्तीनुसार दरवर्षी योग्य त्या प्रमाणात जमा होतो किंवा नाही याची तपासणी सहसंचालक (उपपदार्थ), साखर आयुक्तालय, पुणे यांच्यामार्फत करण्यात यावी.

**७.** सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१३१/का.१४३१, दि. १२.०३.२०२५, व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २३६/२०२५/व्यय-२,दि.२२.०३.२०२५ अन्वये त्या विभागांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२७१७४४३५५००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANKUSH PANDURANG SHINGADE

Digitally signed by ANKUSH PANDURANG SHINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=ANKUSH PANDURANG SHINGADE
Date: 2025.03.27 17:45:21 +05'30'

**(अंकुश शिंगाडे)**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे (३ प्रती)
२. प्रधान महालेखापरिक्षक, लेखा परिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५. महालेखापाल -१, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) मुंबई.
६. महालेखापाल -२, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) नागपूर.
७. संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९. लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे (३प्रती)
१०.सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
११.व्यवस्थापकीय संचालक, संबंधित कारखान्याच्या बँका.
१२.कार्यकारी संचालक, संबंधित सहकारी साखर कारखाने
१३.वित्त विभाग (व्यय-२), कराधान-३ व अर्थसंकल्प-१३, (अर्थोपाय शाखा)
१४.कार्यासन क्रमांक १६-स/१७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई.
१५.सह संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालय, मुंबई.
१६.कक्ष अधिकारी, १६-स तथा वेब को-ऑर्डिनेटर, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई.
१७.निवड नस्ती ( ३-स).